सन २०१६-१७ करीता महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनांतर्गत (MEMS) कार्यान्वित सुसज्ज रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएमएस-२०१६/प्र.क्र.२१८/ आरोग्य -३**

१० वा मजला , गो.ते. संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ३१ मार्च ,२०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः इएमएस-२०११/प्र.क. २२४/आरोग्य-३, दिनांक २८ मार्च, २०१३.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/ प्र.क्र. ३८७/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक १५ जून, २०१६
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/प्र.क्र.४५४/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक २९ जून, २०१६
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०१६/प्र.क्र.२१८/ आरोग्य ३, दिनांक १ सप्टेंबर, २०१६, ०५ नोव्हेंबर, २०१६ व ३० नोव्हेंबर, २०१६
५) ज्ञापन, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०१६/प्र.क्र.२१८/ आरोग्य ३, दिनांक ३१ मार्च, २०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्प योजनेस शासन निर्णय, दिनांक २८ मार्च, २०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेअंतर्गत रुग्णवाहिकांवरील आवर्ती खर्चासाठीची देयके अ. क्र.४ येथील शासन निर्णयान्वये वेळोवेळी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. या योजनेसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये रु.२०३,६०,७३,०००/- इतके अनुदान मंजूर आहे. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि.०८.०२.२०१७ अन्वये योजनांअंतर्गत बाबीवरील खर्चाची मर्यादा ८० टक्के एवढी विहित करण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेअंतर्गत मंजूर अनुदानाच्या ८० टक्के रु. १६२,८८,५८,४००/- कोटी इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला असून इतकाच निधी सुधारित

अंदाज म्हणून वित्त विभागाने मान्य केला आहे. तथापि, या योजनेससाठी वितरीत निधीपेक्षा अधिक निधीची आवश्यकता होती. त्यानुसार वित्त विभागाच्या मान्यतेने उपरोक्त संदर्भ क्रमांक ५ येथील ज्ञापनाव्दारे सन २०१६-१७ या वर्षाकरीता मागणी क्रमांक आर-१, २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्यलेखाशिर्षाखाली काही गौण शीर्षामध्ये असलेली रु.४३,६४,५७,००० कोटी इतकी बचत पुनर्विनियोजन करुन महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा योजनेवरील रुग्णवाहिकांवरील आवर्ती खर्चासाठी असलेल्या लेखाशीर्ष २२१०४६८९ अंतर्गत ३१-सहायक यासाठी उपलब्ध करून देण्यात आलेली आहे.

## शासन निर्णय :-

आता या शासन निर्णयाव्दारे वर नमूद पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध रुपये ४३,६४,५७,००० (रुपये त्रेचाळीस कोटी चौसष्ट लक्ष सत्तावन हजार मात्र) इतका निधी महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा योजनेअंतर्गत रुग्णवाहिकांवरील आवर्ती खर्चासाठीच्या प्रलंबित देयकांसाठी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन परीपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं -२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील परिच्छेद क्र. ७ ते १८ व सोबतच्या परिशिष्टामधील अनु. क्र. ३ व ९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. या पुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीचे लेखा परिक्षण झालेले नसल्यामुळे लेखा परिक्षण / महालेखापाल यांचे आक्षेप उपलब्ध नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमाशी संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च करण्यात येणार आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०) - ट्रॉमा केअर युनिटची स्थापना - महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा, (२२१०४६८९) - ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१६ -१७ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर अनुदानासाठी सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र. क्र. अर्थसं -२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१२४३१६८६१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2017.03.31 20:38:23 +05'30'

**(विवेक दहिफळे)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती (आरोग्य - ३).